सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने " मागणी क्र. एल-३-२४१५ कृषिविषयक संशोधन शिक्षण-(०३) शासकीय संस्थांना सहायक अनुदान (०३) (०१) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी यशदा, पुणे" यांना देण्यात यावयाच्या अनुदानाचे वाटप. मुख्य लेखाशीर्ष - २४१५०५१७ (तिसरा हप्ता वेतनेतर)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०२२/प्र.क्र. २४/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१
दिनांक : १० मार्च २०२३

**वाचा** - १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२२ /प्र.क्र.४३ /अर्थ-३,दि. ०४.०४.२०२२.
२) शासन निर्णय क्रमांक अनुग्रा २०२२/प्र.क्र.२४/आस्था १५, दि. ०२.०५.२०२२ व दि.२३.१२.२०२२.

**प्रस्तावना :**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता मागणी एल-३ -२४१५ कृषिविषयक संशोधन व शिक्षण-(०३) शासकीय संस्थांना सहायक अनुदाने (०३) (०१) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, (यशदा),पुणे यांना ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) "२४१५ ०५१७" या लेखाशिर्षाखाली रुपये २००.०० लक्ष (रुपये दोन कोटी फक्त ) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी तिसरा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं २०२२/प्र.क.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ अन्वये मागणी एल-३ मधील खर्चाकरीता लेखाशिर्ष २४१५०५१७ करीता ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाच्या वितरणासाठी ४२% तरतूदीच्या मर्यादेत रु.८४००.०० हजार (रुपये चौऱ्याऐंशी लक्ष फक्त) इतका निधी संबंधित विभागीय आयुक्त यांच्यामार्फत यशदा पुणे यांना वितरित करण्यात आला आहे.

२. आता आता वित्त विभागाने अनौ. संदर्भ ८४/व्यय.१५, दि.२०.०२.२०२३ अन्वये सन २०२२-२३ या वित्तीय वर्षाकरिता ३१-सहायक अनुदाने ( वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता ७०% च्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन यशदा पुणे यांनी मागणी केल्याप्रमाणे ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता अर्थसंकल्पिय तरतूदीच्या २८ % मर्यादेच्या अधिन राहून **रु. ५६००.०० हजार (रुपये छप्पन्न लक्ष फक्त)** इतके अनुदान संबंधित विभागीय आयुक्त यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

३. सदर खर्च " मागणी क्र. एल-३-२४१५ कृषिविषयक संशोधन शिक्षण-(०३) शासकीय संस्थांना सहायक अनुदान (०३) (०१) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी यशदा, पुणे" मुख्य लेखाशीर्ष - २४१५ ०५१७ या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी .

५. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहील :-

१) यशदा, पुणे यांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

२) यशदा, पुणे यांनी सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर केले आहे, त्यासाठीच खर्च करावे.

३) यशदा, पुणे यांना दरमहा जितके अनुदान आवश्यक असेल तितकेच अनुदान कोषागारातून दरमहा काढण्यात यावे.

४) या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

५) या द्वारे मंजूर रकमेचे देयक करताना देयकावर संबंधीत सांकेतांक न चुकता नमुद करावा.

६. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर व वित्त विभागाकडील अनौ.संदर्भ ८४/व्यय१५, दि.२०.०२.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३१०१२२८२४६३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

URMILA JOSHI

Digitally signed by URMILA JOSHI
DN: cn=URMILA JOSHI, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=usyoj4.rdd-mh@nic.in, c=IN
Date: 2023.03.10 17:58:31 +05'30'

(उर्मिला जोशी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
२. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे (२ प्रती)
३. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
४. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे.
५. जिल्हा कोषागार अधिकारी,
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. कार्यासन क्र. वित्त-१, .वित्त-६, वित्त-७, ग्राम विकास विभाग
१०. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.